तुरुंग अधिकारी,प्रशिक्षण महाविदयालय,
येरवडा,पुणे -६येथील मिनी बस क्रमांक-
एमडब्लयूआर-१०४४साठी टायर खरेदीस
कार्योत्तर मंजुरी देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक-एमआयएस-०१९५/११४/पीआरएस-२.
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक :- २४ सप्टेंबर,२००१.

वाचा:-१)कारागृह उपमहानिरीक्षक,(मुख्यालय) महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र जा.क्र.व्हीईएम/१९९२/क-३ पुणे-१, दिनांक ९.११.२०००.

शासन निर्णय:-

तुरुंग अधिकारी,प्रशिक्षण महाविदयालय,येरवडा, पुणे-६येथील मिनी बस क्रमांक-एमडब्लयूआर-१०४४ साठी सन १९९५-९६ या वित्तिय वर्षात झालेल्या टायर खरेदीच्या खर्चास कार्योत्तर मंजुरी देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

२. शासन परिपत्रक, वित्त विभाग,क्रमांक-एफएनआर-१०६६/१२१९/४४/२६६० रोमन-सात,दिनांक १६.२.१९६६ मधील परिच्छेद (३) मधील सूचनांनुसार सदरहू प्रस्तावाची सविस्तर माहिती पुढीलप्रमाणे आहे :-

| | |
|---|---|
| (१) प्रधान शीर्ष | :- "२०५६ तुरुंग" |
| (२) ज्या कालावधीत खर्च करण्यात आला तो कालावधी | :- १९९५-९६ |
| (३) खर्चाचे स्वरुप | :- मिनी बसच्या टायर खरेदीचा खर्च |
| (४) मंजुरीची रक्कम | :- रु.३२,३७९/- (रुपये बत्तीस हजार तीनशे एकोणऐंशी फक्त) |
| (५) कोणत्या कारणामुळे पूर्वसंमती घेता येऊ शकली नाही. | :-दारुगोळा व शस्त्रपुरवठा इतर कारागृहाना तातडीने करावयाचा होता तसेच प्रशिक्षणार्थींना अभ्यास भेटीसाठी मिनी बसने विविध कारागृहांना घेऊन जाणे अत्यंत गरजेचे होते. |

(६) सार्वजनिक हिताच्या दृष्टीने
खर्चाची बाब अपरिहार्य होती काय? :- होय.
(७) कार्योत्तर मंजुरी घेण्यासाठी तत्परतेने
कार्यवाही करण्यात आली काय? :- होय.

३. तुरुंग अधिकारी,प्रशिक्षण महाविदयालय,येरवडा,पुणे-६ येथील मिनी बस क्रमांक-एमडब्लयूआर-१०४४ साठी सन १९९५-९६ या वित्तिय वर्षात झालेल्या टायर खरेदीच्या रु.३२,३७९/- (रुपये बत्तीस हजार तीनशे एकोणऐंशी फक्त)एवढया रकमेच्या खर्चास शासन या आदेशाद्वारे एक तातडीची बाब म्हणून कार्योत्तर मंजुरी देत आहे.

४. यावर होणारा खर्च "२०५६ तुरुंग-००१ संचालन व प्रशासन ००१(एक)कारागृह महानिरीक्षणालय ३० मोटार वाहने (योजनेतर) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २००१-२००२ या वित्तीय वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक सीआर ५७५/२००१/व्यय-८/दिनांक १३.७.२००१ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सु.म.माने )
**कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन**

प्रति,
कारागृह महानिरीक्षक,कारागृह महानिरीक्षणालय,महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) , महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक,पश्चिम विभाग, पुणे.
महालेखापाल,-१ (लेखा व अनुज्ञेयता) ,महाराष्ट्र मुंबई.
महालेखापाल,-१ (लेखापरिक्षा) ,महाराष्ट्र मुंबई.
कोषागार अधिकारी, पुणे.
कार्यासन (बीयुडी-१) गृह विभाग,मंत्रालय,मुंबई, ४०० ०३२.
वित्त विभाग (व्यय-८) मंत्रालय,मुंबई.
निवडनस्ती.